अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांचे मानधन अदा करण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.१४८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० ऑगस्ट , २०१८

वाचा :- (१) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.१४८/का.६, दि.७ एप्रिल २०१८
(२) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.१४८/का.६, दि. ६ जुलै २०१८

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजन,नवी मुंबई या *कार्यालयाकडून* राबविण्यात येत आहे.अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांना देण्यात येणा-या मानधानासाठी सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेला निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

२. एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून केंद्र व राज्य हिश्याचे निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाल्याशिवाय अर्थसंकल्पित केलेली Shadow तरतूद खर्च करु नये अशा वित्त विभागाच्या सूचना आहेत. केंद्र शासनाकडून वेळेत निधी प्राप्त होत नसल्यामुळे अंगणवाडी सेविकांचे मानधन वेळेत अदा करणे शक्य होत नाही. यास्तव मानधनाची रक्कम उणे प्राधिकारपत्रावर काढण्यास मान्यता देण्याबाबत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २ जून २०१७ रोजी वित्त विभागाने बैठकीचे आयोजन केलेले होते. सदर बैठकीत सेविकांच्या मानधनाची अर्थसंकल्पित केलेली रक्कम केंद्र शासनाकडून निधी प्राप्त झाला नसला तरी खर्च करण्यास विभागास परवाणगी देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

३. अंगणवाडी सेविका/मदतनीस/मिनी अंगणवाडी सेविका यांना देण्यात येणा-या मानधानासाठी सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या निधीपैकी ७०% निधी खर्च करण्यासाठी आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना दिनांक ७ एप्रिल २०१८ च्या शासन वितरीत करण्यात आलेला आहे. मानधन अदा करण्यासाठी निधी कमी पडत असल्यामुळे राज्य लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित असलेला निधी वित्त विभागाच्या मान्यतेने दिनांक ६ जुलै २०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. मानधनासाठी निधी कमी पडत असल्यामुळे जुलै-२०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणी प्रस्ताव सादर करण्यात आला होता. मंजूर पुरवणी मागणीच्या निधीपैकी ७०% निधी खर्च करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिली असून केंद्र व राज्य लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेली व शिल्लक असलेली ३०% निधी APIP च्या प्रमाणात खर्च करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार पुढील लेखाशिर्षाखाली शिल्लक **अस**लेला निधी एकुण **रुपये ४४३२४.८० लाख ( रुपये चारशे त्रेचाळीस कोटी चौवीस लाख ऐंशी हजार फक्त)** इतका निधी खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

( रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | बाब | मानधनासाठी केंद्राकडे सादर केलेला APIP | केंद्राने मंजूर केलेला APIP | अर्थसंकल्पीत निधी | यापूर्वी वितरीत केलेला निधी | **आता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| २२३६१९०९ (केंद्र) | ०२-मजूरी | ३३६८९.६८ | ३२११२.७५ | ३७५००.०० | २६२५०.०० | ५८६२.०० |
| २२३६१९१८ (राज्य) | ०२-मजूरी | २२४५९.७९ | २१४०८.५० | २५०००.०० | १७५००.०० | ३९०८.०० |
| २२३६१९४५ (राज्य) जुलै-१८ पुरवणी मागणी | ०२-मजूरी | | - | २४१२५.०३ + ४९३६४.०० **७३४८९.०३** | २४१२५.०३ | ३४५५४.८० |
| **एकुण** | | | | **१३५९८९.०३** | **६७८७५.०३** | **४४३२४.८०** |

हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.१९२/व्यय-६, दिनांक २८/८/२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८३०१४४३२०३२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.08.30 14:46:45 +05'30'

**( ला.रा.गुजर )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व,जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
६) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
९) सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
११) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२) (नियोजन विभाग/का.१४७२),मंत्रालय,मुंबई.
१३) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त,ए.बा.वि.सेवायोजना,नवी मुंबई यांना वितरीत करावा.
१४) निवड नस्ती -का-६.